**सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षाकरीता प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी २२१० जी ४९४ (TSP) या लेखाशिर्षाखाली राज्य हिस्स्यापोटी (४०%) निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रजयो-२०२०/प्र.क्र.८३/आरोग्य-६**
गो.ते. रुग्णालय संकुल इमारत, १० मजला,
मंत्रालय, एल.टी. मार्ग, मुंबई
तारीख: ०७ जुलै, २०२०.

**वाचा -**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दिनांक २६ फेब्रुवारी,२०१९.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन पत्र क्रमांकः निविदा-२०१९/प्र.क्र.५७/आरोग्य-६ दिनांक ०५ फेब्रुवारी, २०२०
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२०.
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ४ मे, २०२०.
५) राज्य आरोग्य हमी सोसायटी यांचे पत्र क्रमांक: राआहसो/लेखा/प्रअ/६५५२/५७२/२०२० दिनांक: १९ मे, २०२०.
६) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: बीयुडी-२०२०/प्र.क्र. ०५/कार्या.-०६ दिनांक: ६ जुलै, २०२०

**प्रस्तावना -**

आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेचे महात्मा फुले जन आरोग्य योजनेशी संलग्नीकरण करून दोन्ही योजना राज्यामध्ये राबविण्याचा निर्णय दिनांक २६.०२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. प्रधानमंत्री जन आरोग्य योजना ही केंद्र पुरस्कृत योजना केंद्र व राज्य शासनाच्या सहभागातून राज्यात राबविण्यात येत असून यामध्ये केंद्र शासनाचा ६०% व राज्य शासनाचा ४०% आर्थिक सहभाग आहे. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात सदर योजनेसाठी २२१० जी ४९४ (राज्य हिस्सा ४० टक्के) या लेखाशिर्षाखाली रू. २०,००,००,०००/- इतका अर्थसंकल्पित निधी उपलब्ध आहे. प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी ०१ जुलै, २०२० ते ३० सप्टेंबर, २०२० या कालावधीकरीता राज्य हिस्स्यापोटी रक्कम रु. ६,०५,५२,२२९/- (अक्षरी रूपये सहा कोटी पाच लक्ष बावन्न हजार दोनशे एकोणतीस फक्त) Escrow Account मध्ये वर्ग करण्यासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेसाठी राज्य शासनाच्या हिस्स्यापैकी (४० टक्के) रक्कम रु. ६,०५,५२,२२९/- (अक्षरी रूपये सहा कोटी पाच लक्ष बावन्न हजार दोनशे एकोणतीस फक्त)एवढा सशर्त निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर निधी सोसायटीकडे वर्ग करण्यास अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

३. वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसंकल्प-२०२०/प्र.क्र ६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल, २०२० सोबतच्या परिशिष्टामधील अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. तसेच या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी योजनेच्या अंमलबजावणीसाठी उघडण्यात आलेल्या Escrow Account मध्ये जमा झाल्यानंतर सदर निधी योजनेच्या लाभार्थ्यांच्या विमा हप्त्यापोटी विमा कंपनीस अदा करण्यात येणार आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

४. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०३-ग्रामीण आरोग्य सेवा- विषमचिकित्सा, ७९६, जनजाती क्षेत्र उपाययोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपाययोजना, (०१) (०७)-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) २२१० जी ४९४, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या तरतुदीच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

५. सदरील खर्च हा सशर्त असून केलेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र व योजनेच्या प्रगतीचा अहवाल केंद्र व राज्य शासनास विहित प्रपत्रात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वेळोवेळी पाठविण्यात यावा. तसेच सदरील निधी हा सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात खर्च करण्यात यावा. प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी प्राप्त झालेल्या अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

६. आदिवासी उप योजनेंतर्गत उपलब्ध झालेला निधी खर्च करताना आदिवासी विकास विभागाच्या दिनांक ६ जुलै, २०२० च्या शासन निर्णयामध्ये नमूद सर्व अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन राज्य आरोग्य हमी सोसायटीने करावे.

७. सदर शासन निर्णय, आदिवासी विकास विभागाच्या दिनांक ६ जुलै, २०२० च्या शासन निर्णयानुसार व वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र. १८७/व्यय-१३ दिनांक १७.०६.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०७११३६१८४३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Nivruti Gadge

Digitally signed by Subhash Nivruti Gadge
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b1f74930407346db2703eca69fb25a73a3ba8647d94e4c83579e877eeaa6372e, cn=Subhash Nivruti Gadge
Date: 2020.07.07 18:29:09 +05'30'

(सु.नि.गाडगे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई. (३ प्रती)
९. नियोजन विभाग (कार्यासन१४७२), मंत्रालय, मुंबई
१०.वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१३/अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई-३२.
११.आदिवासी विकास विभाग (कार्यासन-६),मंत्रालय,मुंबई
१२.अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती.